

# मुलगा काय?
# मुलगी काय?



लेखक : कमला भसीन
रुपांतर : किशोर दरक

पुस्तकाचे नाव : मुलगा काय? मुलगी काय?
लेखक : कमला भसीन
रुपांतर : किशोर दरक
संपादन : विनया मालती हरि
चित्रकार : बिंदीया थापर

जवाआं/म ६८ (प्रथमावृत्ती)
प्रकाशन : मार्च, २००७

देणगी मूल्य : सोळा रुपये


बालवाचकांसाठी भारत ज्ञान विज्ञान समुदायतर्फे चालवल्या जात असलेल्या 'बालपुस्तक माला' मोहिमेअंतर्गत कृतिआधारित आनंददायी शिक्षण कार्यक्रमाकरिता प्रकाशित

प्रकाशक : विनया मालती हरि
राज्य सचिव, भारत ज्ञान विज्ञान समुदाय (महाराष्ट्र)
३०५, आधार अपार्टमेंट, नारायण पेठ,पुणे-४११०३०
फोन व फॅक्स: ०२०-२४४३४१३३/ई मेल : mahabgvs@sancharnet.in
मुद्रण स्थळ : एम आर अँड कंपनी, पुणे- ३०/९८२२८४३१३८

अक्षर जुळणी : सुनिता जगदाळे

# प्रस्तावना

स्वातंत्र्याच्या सुवर्णमहोत्सवानंतरही आपल्या देशात मुली आणि महिलांना दुय्यम नागरिक मानलं जातंय. मुलगी जन्मल्यावर आनंद होत नाही. त्यांचं संगोपन नीट केलं जात नाही. 'मुलगा खातो तुपाशी अन् मुलगी राहते उपाशी' अशी परिस्थिती सगळीकडेच दिसते. आणि काही ठिकाणी तर मुलीच्या जन्माआधीच किंवा जन्मतःच तिला मारून टाकलं जातं.

कुटुंबामध्ये अशाप्रकारचा भेदभाव, अन्याय होणं ही फार विचित्र गोष्ट आहे. अशा भेदभावामुळं फक्त बायकांचंच नाही तर संपूर्ण कुटुंब अन् समाजाचं नुकसान होतं. घरातली निम्मी माणसं निरोगी, सुशिक्षित अन् निम्मी माणसं अर्धशिक्षित, उपाशी! जणू एखाद्या

शेतकऱ्याचं निम्मं शेत डोलणारं अन् निम्मं उदास, खुरटलेलं.

ही परिस्थिती बदलायला हवी अन् बदलण्यासाठी ती समजून घ्यायला हवी. काही लोक म्हणतात की निसर्गानेच स्त्री-पुरुषांना असमान बनवलंय. हे खरं आहे का? की हा भेदभाव समाजाने लादलाय? मुला-मुलींच्या आवडी-निवडी, त्यांच्यातल्या क्षमता, जगण्याचे त्यांचे मार्ग निसर्गाने बनवलेत का आपण?

या पुस्तिकेमध्ये या प्रश्नांवर चर्चा घडवण्याचा एक छोटासा प्रयत्न केलाय की ज्यामुळे आपल्या मुलींच्या आयुष्यातला भेदभाव अन् अन्याय संपावा, मुलांवर काही विशिष्ट गुण, वागण्या-बोलण्याच्या पद्धती लादल्या जाऊ नयेत अन् घराघरात प्रेम, सद्भाव आणि शांती असावी. मुली-मुले, स्त्रिया अन् पुरुष बरोबरीने प्रगतीच्या मार्गावर चालत राहावेत म्हणून हा खटाटोप. ही पुस्तिका तुम्हाला आवडेल अन् उपयोगी पडेल अशी आशा आहे.





मुलगी म्हणजे काय?
मुलगा म्हणजे काय?
मूल जन्मतं ते मुलगी
किंवा मुलगा म्हणून.





मुलगी कशी असते?









काही जण म्हणतात की जिचे केस
लांब असतात ती मुलगी.



कुलदीपचे केस पहा
किती लांब आहेत. पण
तो तर मुलगा आहे.







दागिने घालणारी ती
मुलगी असं म्हणतात.



मेघराज पहा. त्याच्या गळ्यात माळ अन् कानात डूल. तो पण मुलगाच आहे.







मुलगा कसा असतो?

मुलगे चड्डी घालून झाडावर चढतात असं काही जण म्हणतात.

ही पहा राणी. शर्ट चड्डी घालून
कशी चटकन झाडावर चढलीय.







काही लोक म्हणतात की
ताकदवान असणारा अन् ओझं
उचलणारा तो मुलगा !



सईदा अन् राधा पहा. दोन दोन हंडे
पाणी किंवा लाकडाच्या मोळ्या
उचलणाऱ्या या मुली काय
ताकदवान नाहीत?







घरकामात मदत करणाऱ्या
त्या मुली, असं म्हणलं जातं.



जोसेफ स्वयंपाकात अन्
सफाईकामात आवडीने
मदत करतो. तो मुलगा आहे.







काही जणं असं म्हणतात
की शेतात काम करतात,
ते मुलगे असतात.



सुषमा अन् तिची आई
शेतात कामं करतात. एक
मुलगी अन् एक आहे बाई!







बाजारातले व्यवहार मुलगेच करू
शकतात असं काहींना वाटत.



रखमा भाजीबाजारात
बसून मासळी विकते.
ती मुलगी आहे.







जी कोमल आहे, जिच्यात ममता
आहे ती म्हणजे मुलगी, असं
बऱ्याच जणांना वाटतं.



कबीर पहा. किती मायेनं छोट्या
बहिणीला दिवसभर सांभाळतो.
तो तर मुलगा आहे!







समाजात बंदोबस्ताचं भक्कम काम
करायचं तर त्यासाठी मुलगेच हवेत
असं काहीजण मानतात.

राधा, जिल्हाधिकारी या नात्याने
संपूर्ण जिल्ह्याचा बंदोबस्त ठेवते.
आणि ती एक बाई आहे.





मग मुलगा काय असतो?
मुलगी काय असते?





मुलगा तो ज्याला शिश्न
अन् वृषण आहेत.



मुलगी ती जिला योनी
अन् स्तन आहेत.



सगळे मुलगे मोठे होऊन पुरुष बनतात.
सगळ्या पुरुषांना शिश्न अन् वृषण असतात.
मुलगी मोठी होऊन बाई बनते.
बाईला योनी, गर्भाशय अन् स्तन असतात.
बाईच्या शरीरात मूल बनतं अन् वाढतं.
ती मूलं जन्माला घालते अन् दूध पाजते.



या शारीरिक फरकाखेरीज
मुला-मुलीत दुसरा कोणताच फरक नाही.
आणि शरीरातसुद्धा
फरक खूप कमी अन् समानताच जास्त आहे.
जननेंद्रिय आणि प्रजनन अंगाशिवाय
सगळं शरीर सारखंच असतं.





या शारीरिक रचनेला
**नैसर्गिक लिंग** म्हणतात.
या शारीरिक रचनेमुळेच मुलगें पुल्लिंगी तर मुली
स्त्रीलिंगी असतात. हा लिंगभेद निसर्गाने निर्माण
केलाय अन् हा भेद कोणत्याही कुटुंबात, समाजात
अन देशात **सारखाच आढळतो.**
म्हणजे शारीरिक रूपाने मुलगा सर्वत्र मुलगाच
अन् मुलगी सर्वत्र मुलगीच राहते!



शारीरिक फरकांशिवाय
मुला-मुलींमधले इतर फरक
कपडे, वागणूक, शिक्षण,
समाजाचा त्यांच्याकडे बघण्याचा दृष्टिकोन,
इत्यादि सगळे सामाजिक आहेत,
नैसर्गिक नाहीत. म्हणून तर हे फरक
प्रत्येक कुटुंबात अन् समाजात
वेगवेगळे दिसतात.





जसं आपण मगाशी बघितलं
काही मुलींचे केस लांब असतात
तर काही जणींचे छोटे.
काही घरांमध्ये
मुलगे
घरातील कामे करतात
आणि
काही नोकरी धंदा करतात.





समाजाने दिलेल्या या स्त्री-पुरुष व्याख्येला सामाजिक लिंग (Social Gender) म्हणतात.







उदा., सामाजात असे काही
संकेत रूढ आहेत की,
मुलगी घरात राहील
अन् मुलगा बाहेर जाईल
किंवा
मुलींना खाणं-पिणं-खेळणं कमी लागतं
अन् मुलांना जास्ती!
मुलांनी चांगल्या शाळेत जायला हवं,
कारण
त्यांना मोठं होऊन चांगला
व्यवसाय-नोकरी करायचीय.
मुलींच्या शिक्षणाकडे तितकंसं
लक्ष देणं गरजेचं नाही.





हे सगळे सामाजिक लिंगभेद
निसर्गनिर्मित नाहीत.
निसर्ग फक्त मुलगी अन् मुलगा निर्माण करतो.
समाज मात्र
त्यांचे स्त्री आणि पुरुष
अशा भूमिकांमध्ये विभाजन करतो.







समाजाच्या या दृष्टिकोनामुळे
मुला-मुलींमधले फरक
वाढतच जातात अन्
असं वाटायला लागतं की
स्त्री आणि पुरुष
यांचं जगच वेगवेगळं आहे.



सामाजिक लिंगभेद
मुलगा-मुलगी, स्त्री-पुरुष
यांच्यात असमानता निर्माण करतात.
समाज म्हणतो,
पुरुष म्हणजे कर्तृत्त्ववान अन्
स्त्रिया बिन कामाच्या.
जी कामे पुरूष करतात
त्यांना मजुरी जास्त अन्
बायकांच्या कामांना मात्र
कमी मजुरी मिळते.
पुरुष सत्ताधीश आहे,
अन् बाई सत्ताहीन!





निसर्ग असमतोल निर्माण करत नाही.
तो फक्त प्रजननासाठी
स्त्री-पुरुषांना वेगवेगळी
जननेंद्रिये बहाल करतो.
स्त्री-पुरुषांमध्ये
भेद-भाव, उच्च-नीचता,
जगण्याच्या निरनिराळ्या पद्धती,
समाजाने म्हणजेच
आपण सर्वांनी निर्माण केल्यात.
गरीब-श्रीमंत, दलित-सवर्ण,
काळा-गोरा, स्त्री-पुरुष
हा फरक निसर्गाने नव्हे तर
समाजाने बनवलेला आहे.





खरं तर प्रत्येक व्यक्तीमध्ये
स्त्री अन् पुरुष दोघं असतात.
पण मुलीत दडलेलं पुरुषत्व
अन् मुलात दडलेलं स्त्रीत्त्व
समाज
उमलूच देत नाही..



स्त्री पुरुषामधल्या समानतांना
मोकळी वाट देण्याऐवजी
समाज त्यांच्यातले भेदच
अधोरेखित करत राहतो.
यामुळेच त्यांच्यातली
फरकाची दरी वाढते आहे
अन् त्यांचे मार्ग
वेगवेगळे होत निघालेत.
असमानतेने त्यांच्यातला
तणाव अन् द्वंद्व
वाढते आहे.





जगातल्या बहुतेक देशांमध्ये सामाजिक लिंगभेद
पितृसत्ताक आहेत. म्हणजे सत्ता पुरूषांची,
त्यांना प्राधान्य देणारी दिसते.
आणि बाईविरोधी या व्यवस्थेत
मुलींवर अनेक बंधनं लादली जातात,
त्यांच्याविरूद्ध पक्षपात होतो आणि
त्यांना हिंसेला तोंड द्यावे लागते.



यामुळेच मुली, मुलांसारखी प्रगती करू शकत नाहीत.
स्वतःची कौशल्यं अन् क्षमता फुलवू शकत नाहीत.
एकाच घरात मुलगे उमलत जातात
अन् मुली कोमेजत रहातात.



या लिंगभेदाचा दुष्परिणाम फक्त
मुलींवरच नव्हे तर त्यांच स्वतःच



कुटुंब, समाज तसेच संपूर्ण
देशावर होतो.



मुलांवरदेखील काही विशेष कामे,
गुण अन् जबाबदाऱ्या
लादल्या जातात.



सामाजिक लिंगभेद मानवनिर्मित आहेत.
ते आपण बदलू शकतो.
इच्छा असेल तर मुलगी-मुलगा, स्त्री-पुरुष
यांची नवी व्याख्या करू शकतो.
अशा समाजाची आपण निर्मिती करू शकतो,
ज्यात मुलगी दुर्बल,कर्तृत्त्वहीन आणि
मुलगे क्रूर, हिंसक नसतील.





खरं तर कोणतीही मुलगी
किंवा
कोणताही मुलगा
जे हवे ते कपडे वापरू शकतात,
खेळ खेळू शकतात, वाचू-लिहू शकतात,
काम करू शकतात.
नुसतं मुलगी म्हणून जन्मल्याने
घरकाम, सेवाभाव येत नाही.
तसंच मुलगा म्हणून जन्मल्याने
निडरपणा, हुशारी, शक्ती येत नाही.
हे सर्व काम आणि गुण
शिकण्या-शिकवण्यातून येतात.
एखाद्याची वाढ ज्या वातावरणात होते,
तसेच तो/ती बनतात.



आपण सर्वांनी ठरवलं तर
एक असा समाज निर्माण करू शकतो
ज्यात काम, गुण, जबाबदाऱ्या, कौशल्यं
वागण्याच्या पद्धती, ही कोणत्याही
लिंग, जात, रंग, वर्ग यांच्यावरून
ठरणार नाहीत. अशा समाजात सर्वांना
आपल्या स्वभाव अन् मर्जीनुसार
काम करता येईल, कौशल्ये
आत्मसात करता येतील
आणि व्यवहार करता येईल.







## चर्चेसाठी काही मुद्दे

जगण्याच्या दोन पद्धती आहेत. पहिली म्हणजे कसलाही प्रश्न न विचारता रीतीरिवाज, परंपरा मानत जगणं. जे जसे आहे त्याला तसंच आपलंसं करायचं, असं केल्यानं फायदा अथवा नुकसान काय होणार याचा जरासाही विचार न करता!

आणि दुसरी पद्धत म्हणजे जे करायचं ते जागरूक मनानं, असं का करतो आहोत ते समजून घेऊन जगणं. कुणी तरी केवळ एक पद्धत रूढ केली, किंवा एक चाकोरी घालून दिली म्हणून तसं वागायचं की खरंच ती पद्धत चांगली आहे का, सगळ्यांसाठी फायदेशीर आहे का, हे समजून घेऊन जगणं.

आम्हाला वाटतं जागरूक मनानं जगणं जास्ती चांगलं, त्यात खरी मजा आहे. त्यामुळे आपण बदलत राहतो, बदलत्या परिस्थितीशी जुळवून घेत राहतो. जर सगळ्यांनी जागरूकपणे प्रश्न विचारण्याचं धाडस दाखवलं तर आपल्या समाजात विचार करणं अथवा समाजाचं बरं वाईट करणं या गोष्टी मूठभरांच्या हाती उरणार नाहीत.

सध्या एका विषयावर आपल्या समाजात जोरदार चर्चा सुरू आहे, ती म्हणजे आपल्या घरातील आणि समाजातील स्त्री-पुरुषांचा दर्जा आणि त्यांच्यातील संबंध! ही चर्चा अशीच आणखी चालू ठेवणं गरजेचं आहे. आणि याचसाठी आम्ही ही पुस्तिका सादर करत आहोत.

या पुस्तिकेमध्ये एक मूलभूत प्रश्न उपस्थित केला गेलाय तो हा की, मुलगी-मुलगा किंवा स्त्री-पुरुष काय आहेत? या दोघांमध्ये काय फरक आहे? मुलामुलींचे गुण, त्यांची कामं वेगळी असणं आवश्यक आहे का? जर विविधता हवी असेल तर त्यात उच्चनीच असा भेदभाव का असावा? वेगळेपणातही समानतेचा धागा आहे का? दोघांच्या कामांना सारखं महत्व आणि आदर मिळायला नको?

असे प्रश्न उपस्थित करून छोटी मुले आणि मोठी माणसे यांच्याशी गटागटांतून चर्चा केली जाऊ शकते. लोकांना वरील मुद्दे आपल्या परिसराशी जोडून घेता येतील अशा पद्धतीने ती व्हावी. उदाहरणादाखल असे काही प्रश्न विचारता येतील का पहा -

- गावातल्या सगळ्या मुलींचे केस लांब आणि सगळ्या मुलांचे केस छोटे आहेत का?
- एखाद्या मुलीचे केस छोटे आहेत म्हणून किंवा कुण्या मुलाचे केस मोठे आहेत म्हणून त्यांची चेष्टा केली जाते का?

ø एखादी मुलगी पँटशर्ट वापरते का? तिचं नाव काय? लोक तिला हसतात का?

ø कुणी मुलगा गळ्यात चेन किंवा कानात डूल घालतो?त्यामुळे तो मुलींसारखा होतो का?

ø मुलीं झाडावर चढतात कां? नसेल तर का नाही?

ø तुमच्या घरी अशी कोणती कामं असतात जी मुलीच करतात, मुलं करत नाहीत? मुलींना-बायकांना करू दिली जात नाहीत अशी कोणती कामं आहेत? असं का?

ø जास्त मेहनतीची कामं कोण करतं?

ø मुली मोकळ्या मैदानात खेळतात? मुलांच्या बरोबर खेळतात?

ø मुलींना शाळेत पाठवलं जातं?

ø न घाबरता त्या गावात फिरू शकतात?

ø एकट्या मुलीची छेड काढली जाऊ शकते? कोण काढतं?

ø आसपासचे लोक याबाबतीत काय करतात?

ø एका स्वतंत्र देशात आपल्याच वस्तीत किंवा गावात मुली मोकळेपणाने फिरू शकत नाहीत हे आपल्याला पटतंय? या बाबतीत समाज गप्प का राहतो?

ø घरात मुलाला आणि मुलीला बरोबरीचं समजले जाते का? त्यांना सारखंच प्रेम आणि सवलती मिळतात का? नसेल तर का नाही?

ø अशा काही रूढी, परंपरा, पद्धती आहेत का ज्या आपल्याला मान्य नाहीत? त्या बदलण्याची इच्छा आहे का?

ø मुलाला आणि मुलीला समान दर्जा मिळावा असं आपल्याला वाटतं का? जर हो असेल तर का? आणि नाही असेल तरी का?

ø घरातच कुणावर अन्याय होत असेल तर आपल्याला काय वाटतं? आपण गप्प राहतो की काही करण्याचा प्रयत्न करतो?

ø घरात कधी काही बदलण्याचा प्रयत्न केलाय? नेमका कोणता बदल केलात? घरच्यांना काय वाटलं त्याबद्दल?



ø अशा प्रकारचे आणखी खूपसारे प्रश्न विचारता येतील. प्रत्येकाला बोलण्याची संधी देता येईल?

ø काही विषयांवर वादविवाद होऊ शकतो. उदा. घरात कोणाची काय कामे असतात? जास्त काम कोण करतं? कोण, कुणाशी, कसं बोलतं? कोण आधी जेवतं? गावातल्या किती बायका घराबाहेर काम करतात? काय काम करतात? त्यांना मजुरी किती मिळते? पुरुषांना त्याच कामासाठी किती मजुरी मिळते? पैसे कमावणाऱ्या बायकांना घरात आणि समाजात जास्त आदर मिळतो?

संपूर्ण अयोग्य वाटणाऱ्या पद्धतींची यादी गटाला करता येईल?नंतर मग या पद्धती बदलणार कशा याबाबत चर्चा होऊ शकेल? संपूर्ण गट काही ठोस बदल घडवू शकतं का? जर चर्चेची परिणती जर एखाद्या ठोस कार्यक्रमात झाली तर फार उत्तम.

हा विषय अजून खोलात समजावून घ्यायचा असेल तर अनेक संस्था-संघटनांकडून पुस्तकं, पोस्टर्स, स्लाईडस्, चित्रपट मिळवले जाऊ शकतात.

कुटुंबात आणि समाजात मुला-मुलींना एकाच दृष्टीने पाहिलं जावं हे आमचं स्वप्न आहे. दोघांमध्ये भेदभाव नसावा. दोघांना समान हक्क मिळावा - उमलण्याचा, शिकण्या-समजण्याचा, जगण्याचा. आपण सगळे हे स्वप्न पाहायला लागू आणि ते साकार करण्यासाठी काही ठोस प्रयत्न करू तेव्हा बदल निश्चित होतील. एका फुलपाखराच्या फडफडण्याने दूरवर उलथापालथ होऊ शकते असा सिद्धांत काही वैज्ञानिक मांडतात. मग आपण सगळ्यांनी मिळून काही केलं तर ही परिस्थिती निश्चितच बदलेल.

*****



# जन वाचन आंदोलन

बाल पुस्तकमाला

## प्रश्न विचारा पुन्हा पुन्हा

प्रश्न विचारा पुन्हा पुन्हा असेच का अन् तसेच का?
शिकणे कधी संपत नाही होवू द्या लाख चुका
कुत्र्याची शेपूट वाकडी का?
पेंग्वीनची मान तोकडी का?
क्रिकेटची बॅट लाकडी का?
सापाची चाल वाकडी का?
वटवाघुळ रात्री फिरतात का?
मासे पाण्यात तरतात का?
पतंग दिव्यावर मरतात का?
काजवे चमचम करतात का?
खोकल्याची उबळ येते का?
थंडीत नाक गळते का?
मेंदूला वास कळतो का?
आठवणीने उचकी लागते का?
रंगीत तारे असतात का?
दिवसा तारे दिसतात का?
जीवसृष्टी कुठेतरी असेल का? माणसासारखा माणूस दिसेल का?



सुकन्या आगाशे

मुलगा काय? मुलगी काय? या विषयी विज्ञानविज्ञाचा पारंपारिक समज हे पुस्तक ठोकरते. मुलगा - मुलगी समानतेबाबत वैज्ञानिक पायावर आधारित संवाद हे पुस्तक करते. यामध्ये मुलींच्या जीवनात होणारे अन्याय नष्ट करण्याचा आग्रह धरलेला आहे. मुलगा-मुलगी, स्त्री-पुरुष एकत्रितपणे, समानतेच्या वातावरणात आपला विकास साधतील असा एक प्रयत्न या व्दारे केला गेला आहे.

भारत ज्ञान विज्ञान समुदाय